**नागभीड जि.चंद्रपूर येथील ग्रामिण रुग्णालयाचे १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करणे आणि मौजे नान्होरी ता.ब्रम्हपुरी जि.चंद्रपूर येथे नविन प्राथमिक आरोग्य केंद्र स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्थापना - २०१६ /प्र.क्र.१६/आरोग्य-३**

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २४ ऑगस्ट,२०१८

**वाचा -**

1. **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक, संआसे/कक्ष-३/श्रेणी /ग्रारु,नागभीड/१०० खाटा/ श्रेणीवर्धन/४४५-४८/१६, दिनांक.-२०.०१.२०१६.**
2. **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक, संआसे/कक्ष-७ अ/अे-७/नान्होरी/चंद्रपूर/प्राआकेंद्र/स्थापना/ /२०१७,दिनांक -३०.१२.२०१७.**

**प्रस्तावना -**

नागभिड जि.चंद्रपूर येथील ग्रामिण रुग्णालयाचे १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करणे आणि मौजे नान्होरी ता.ब्रम्हपुरी जि.चंद्रपूर येथे प्राथमिक आरोग्य केंद्र स्थापन करणेबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी मागणी केली आहे. त्यानुसार नागभिड जि.चंद्रपूर येथील ग्रामिण रुग्णालयाचे १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करणे आणि मौजे नान्होरी ता.ब्रम्हपुरी जि.चंद्रपूर येथे प्राथमिक आरोग्य केंद्र स्थापन करणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

नागभीड जि.चंद्रपूर येथील ग्रामिण रुग्णालयाचे १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करणे आणि मौजे नान्होरी ता.ब्रम्हपुरी जि.चंद्रपूर येथे प्राथमिक आरोग्य केंद्र स्थापन करण्यास "विशेष बाब" म्हणून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. मौजे नान्होरी ता.ब्रम्हपुरी जि.चंद्रपूर येथे प्राथमिक आरोग्य केंद्र सुरु करण्यासाठी जिल्हा नियोजन व विकास समिती आणि जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेत ठरावास मंजूरी घेण्यात यावी.

३. सदर नागभीड जि.चंद्रपूर येथील श्रेणीवर्धीत उपजिल्हा रुग्णालय आणि नान्होरी ता.ब्रम्हपुरी जि.चंद्रपूर येथील नविन प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी विहित पध्दतीने जागा अधिग्रहीत करुन बांधकाम व पदनिर्मिती करणे याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२४१६१७३४८९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.08.24 17:01:35 +05'30'

**(रो.दि.कदम -पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, (प्रा.आ. केंद्र/ उपकेंद्र/दवाखाने) मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, चंद्रपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
९. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामिण रुग्णालय, नागभीड जि.चंद्रपूर.
१०. नियोजन विभाग,(का.१४७२) मंत्रालय,मुंबई
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

